महाराष्ट्र कृषि सेवा, गट-ब (कनिष्ठ)
संवर्गातील अधिकाऱ्यांना महाराष्ट्र कृषि सेवा,
गट-ब संवर्गात पदोन्नती देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन आदेश क्रमांकः आकृवि २१२०/प्र.क्र.१७०/१५अे**
**मंत्रालय विस्तार इमारत,**
**मंत्रालय, मुंबई - ३२.**
**तारीखः १९ एप्रिल, २०२२.**

**संदर्भ:-** १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीसीसी-२०१८/प्र.क्र.३६६/१६-ब, दि. ०७/०५/२०२१.
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन अधिसूचना दि. १४/०७/२०२१.
३) कृषि व पदुम विभाग, शासन परिपत्रक क्र. कृषिआ-१९२१/प्र.क्र.२२/१६-अे,दि. १४/०७/२०२१.
४) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय, क्र. आकृवि २१२०/प्र.क्र.१७०/१५-अे, दि. १०/०३/२०२२.

**प्रस्तावना :-**

निवडसूची वर्ष सन २०२०-२१ मध्ये महाराष्ट्र कृषि सेवा, गट-ब (कनिष्ठ) संवर्गातील ७२ अधिकाऱ्यांपैकी ७० अधिकाऱ्यांना संदर्भ क्र. ४ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र कृषि सेवा, गट-ब संवर्गात पदोन्नतीने पदस्थापना देण्यात आलेली आहे. सदर सन २०२०-२१ निवडसूचीतील उर्वरित दोन अधिकारी (अ.क्र.५२ व अ.क्र. ६४ येथील अनुक्रमे श्रीमती कविता महादेव तागडे व श्रीमती शर्मिला नरेंद्रसिंग जाधव) यांना पदोन्नतीने पदस्थापना देण्याबाबत खालील प्रमाणे शासनाने निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र कृषि सेवा, गट-ब (कनिष्ठ) संवर्गातील (वेतनश्रेणी S-१५: ४१८००-१३२३००) खालील अधिकाऱ्यांना महाराष्ट्र कृषि सेवा, गट-ब (वेतनश्रेणी S-१६ : ४४९००-१४२४००) या संवर्गात प्रशासकीय सोईच्या दृष्टीने पुढील अटींच्या अधीन राहून निव्वळ तात्पुरती पदोन्नतीने पदस्थापना करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिका-याचे नांव व सध्याची पदस्थापना | वाटप झालेला महसूली विभाग | पदोन्नतीने पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | श्रीमती कविता महादेव तागडे, कृषि अधिकारी, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प (पोकरा), मुंबई. (निवडसूचीतील अ.क्र.५२ ) | नागपूर | कृषि तंत्र अधिकारी (महाराष्ट्र कृषि सेवा, गट-ब), प्रकल्प अंमलबजावणी कक्ष महिला आर्थिक विकास महामंडळ (राज्यस्तर), मुंबई या पदावर प्रतिनियुक्तीने पदस्थापना. (नागपुर मुळ महसुली विभाग कायम ठेवून) |

| अ.क्र. | अधिका-याचे नांव व सध्याची पदस्थापना | वाटप झालेला महसूली विभाग | पदोन्नतीने पदस्थापना |
|---|---|---|---|
| २. | श्रीमती शर्मिला नरेंद्रसिंग जाधव, मंडळ कृषि अधिकारी, उरण, जि. रायगड (निवडसूचीतील अ.क्र. ६४) | अमरावती | तंत्र अधिकारी, प्रकल्प अंमलबजावणी कक्ष महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, नवी मुंबई येथे प्रतिनियुक्तीने पदस्थापना (अमरावती मुळ महसुली विभाग कायम ठेवून ) |

२. उपरोक्त अधिकाऱ्यांना खालील अटींच्या अधीन राहून पदोन्नती देण्यात येत आहे :-

**(अ)** सदर पदोन्नती ही मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी याचिका क्र. २७९७/२०१५ मध्ये दि. ०४/०८/२०१७ रोजी दिलेल्या निर्णयाविरोधात राज्य शासनाने मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या व प्रलंबित असलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र. २८३०६/२०१७ वरील मा. सर्वोच्च न्यायालयाच्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहून निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात रिक्त असलेल्या पदांवर ज्येष्ठतेने देण्यात येत आहे.

**(ब)** सदर पदोन्नती ही तात्पुरत्या स्वरूपाची असल्यामुळे पदोन्नतीच्या दिनांकापासून सेवाज्येष्ठतेचा हक्क सांगता येणार नाही.

**(क)** संबंधित अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र कृषि सेवा, गट-ब पदावरील तात्पूरती पदोन्नती नाकारल्यास सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३०३/का.१२, दि. १२/०९/२०१६, सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. एसआरव्ही २०१८/प्र.क्र.१५९/का.१२, दि. ०१/०८/२०१९मधील तरतूदीनुसार संबंधित अधिकाऱ्यांचे नाव सन २०२०-२१ च्या निवडसूचीतून काढून टाकण्यात येईल आणि पुढील दोन वर्षी (सन २०२१-२२ व २०२२-२३) होणाऱ्या निवडसूचीमध्ये त्यांच्या नावाचा विचार न करता तिसऱ्या वर्षाच्या निवडसूचीत (सन २०२३-२४) महाराष्ट्र कृषि सेवा, गट-ब पदावरील तात्पुरत्या पदोन्नतीसाठी त्यांची पात्रता तपासण्यात येईल.

**(ड)** सदर अधिकाऱ्यांची महाराष्ट्र कृषि सेवा, गट-ब पदावरील तात्पूरती पदोन्नती ही सदर अधिकाऱ्यांविरूध्द प्रस्तुत आदेशाच्या दिनांकापर्यत कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी सुरू झालेली नाही वा प्रस्तावित नाही या धारणेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

**(इ)** उपरोक्त अधिकाऱ्यांनी त्यांचा सध्याच्या पदाचा पदभार विभागातील निकटतम ज्येष्ठ अधिकाऱ्यांकडे सोपवून तात्काळ पदोन्नतीच्या पदावर रूजू व्हावे. तसेच पुढील बाबही निदर्शनास आणण्यात येते की, सामान्य प्रशासन विभागाच्या शासन अधिसूचना दि. २१/०६/२०२१ मधील तरतुदीनुसार संबंधित अधिकाऱ्यांनी सदर आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून ३० दिवसात पदोन्नतीच्या पदावर रूजू होणे आवश्यक आहे.

**३.** उपरोक्त पदोन्नतीने पदस्थापना श्रीमती कविता महादेव तागडे व श्रीमती शर्मिला नरेंद्रसिंग जाधव यांच्या सन २०२०-२१ च्या निवडसूचीतील ज्येष्ठता क्रमानुसार देण्यात येत आहे.

**४.** आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सदरचे आदेश तात्काळ अंमलात येतील हे कृपया पहावे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०४१९१३०१२३६७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

AMOL NILAKANTH SAKHARKAR

Digitally signed by AMOL NILAKANTH SAKHARKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=36b60751d094e56d974e1a44ec234c475fb0de5b35a79c1cf69a588f212b260e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BB4888CEBBF4B7A6440C6531A52925E3C8140B1C28DF723D8F006D11BC169A08, cn=AMOL NILAKANTH SAKHARKAR
Date: 2022.04.19 13:02:25 +05'30'

**( अ.नि. साखरकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. प्रकल्प संचालक, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प, मुंबई.
६. मा.मंत्री ( कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७. मा.मंत्री ( फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
८. मा.राज्यमंत्री (कृषि ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
९. मा.राज्यमंत्री ( फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१०. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परिक्षा) ½, महाराष्ट्र मुंबई / नागपूर.
११. सर्व सह सचिव/उप सचिव ( कृषि ), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२. सह सचिव/उप सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१३. सह सचिव/उप सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१४. सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, पुणे.
१५. उप सचिव (कार्या. १२), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
१६. कृषि सह संचालक, (आस्थापना), कृषि आयुक्तालय, पुणे
१७. संबंधीत विभागीय कृषि सह संचालक ( व्दारा आयुक्त (कृषि) पुणे )
१८. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी ( व्दारा आयुक्त (कृषि) पुणे )
१९. सर्व संबंधित अधिकारी ( व्दारा आयुक्त (कृषि) पुणे )
२०. निवड नस्ती /१५ अे